मौजा लासूर ता.चोपडा जि.जळगांव
येथे पोलीस दूरक्षेत्र निर्माण करणे.

महाराष्ट्र शासन.
गृह विभाग
शासन निर्णय,क्रमांक -पीओपी-१८०१/१९९२/प्र.क्र.१९/पोल-३
मंत्रालय,मुंबई- ४००० ०३२, दिनांक- २१ जुलै, २००३.

<u>वाचाः-</u> पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं-२६/
जळगांव (लासूर) २००१ दिनांक ८.४.२००२

<u>शासन निर्णय :-</u> लासूर गांवाची लोकसंख्या ९०१४ असून,चोपडा ग्रामीण पोलीस ठाण्याच्या हद्दीत असून, त्यांच्यातील अंतर १४ कि.मी.इतके आहे.लासूर गांवाची भौगोलिक परिस्थिती पहाडी व अतिदुर्गम भागाची असून, २ फर्लांग अंतरावरुन अनेर नदी वाहते. अनेर नदी ओलांडल्यावर मध्यप्रदेश राज्याची सरहद्द होते. मध्यप्रदेशातील गुन्हेगार या भागात प्रवेश करुन रस्तालूट, जबरी चोरी,दरोडा इ. गंभीर स्वरुपाचे गुन्हे करुन पोलीस कुमक घटनास्थळी दाखल होण्यापूर्वीच मध्यप्रदेशाच्या अतिदुर्गम भागात फरार होतात. सदर परिस्थिती लक्षात घेता लासूर ता.चोपडा जि.जळगांव येथे पोलीस दूरक्षेत्र निर्माण करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. पोलीस दूरक्षेत्र लासूर करिता १ पोलीस हवालदार व ३ पोलीस शिपाई अशी ४ पदे चोपडा ग्रामिण पोलीस स्टेशनच्या मंजूर मनुष्यबळातून उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. सदर दूरक्षेत्राकरिता आवश्यक साधनसामुग्री वरिल खर्च सन २००३-२००४ च्या मंजूर अनुदानातून भागवता येणे शक्य असल्याने सदर प्रकरणी कोणताही अतिरिक्त निधी मंजूर करण्यात येत नाही. प्रस्तुत निर्णय गृह विभागामार्फत प्रशासकिय स्तरावर घेण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सं. शं. इंगळे )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. पोलीस महासंचालक व पोलीस महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. विशेष पोलीस महानिरीक्षक नाशिक परिक्षेत्र.
३. पोलीस अधिक्षक,जळगांव.
४. महालेखापाल ,महाराष्ट्र -१ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
५. निवड नस्ती.पोल-३.